**औरंगाबाद महानगरपालिकेमध्ये कार्यरत असलेल्या दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांचे महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन व त्याकरिता अधिसंख्य अस्थायी पद निर्मिती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: औमपा-२०१९/प्र.क्र.३१/नवि-२४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक -: २८ सप्टेंबर, २०२०

<u>वाचा</u> : १) नगर विकास विभागाचे पत्र क्र.नपाप्र-१०९९/९९/१५९/९८/नवि-१६,दि.६.५.२०००.
२) आयुक्त,औरंगाबाद महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था-१/२०१९/८४, दि.१६.१.२०१९
३) आयुक्त,औरंगाबाद महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था-१/२०१९/२५२, दि.१८.२.२०१९
४) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्रमांक एमसीओ-२०१८/प्र.क्र.१२२/नवि १४, दि.५.२.२०१९

**<u>प्रस्तावना</u>: -**

राज्यातील विविध नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये कार्यरत असलेल्या दिनांक १०.३.१९९३ पूर्वीच्या रोजंदारी कर्मचाऱ्यांना नियमित सेवेत सामावून घेण्याचा धोरणात्मक निर्णय संदर्भ क्र.१ अन्वये घेण्यात आला आहे. त्याचप्रमाणे, नगरपरिषदा/नगरपंचायतीमध्ये दिनांक ११.३.१९९३ ते दिनांक २७.३.२००० या कालावधीत नियुक्ती होवून कार्यरत असलेल्या रोजंदारी कर्मचाऱ्यांचे समावेशन संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेले आहे.

औरंगाबाद महानगरपालिका आस्थापनेवर दैनिक वेतनावर कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांना त्यांची दिर्घ सेवा विचारात घेवून नियमित समावेशन करण्याबाबत महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने ठराव क्र.५३३ दिनांक ११.७.२०१८ संमत केलेला आहे. सदर ठरावाच्या अनुषंगाने औरंगाबाद महानगरपालिकेत कार्यरत असलेल्या दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या नियमित सेवेत सामावून घेण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांनी संदर्भाधीन क्र.२ अन्वये शासनाच्या मान्यतेसाठी सादर केलेला होता. आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिकेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयाच्या धर्तीवर औरंगाबाद महानगरपालिकेतील कार्यरत असलेल्या दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांचे समावेशन व त्यासाठी आवश्यक अस्थायी अधिसंख्य पद निर्मितीची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर प्रस्तावा संदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>: -**

अ) औरंगाबाद महानगरपालिकेच्या संदर्भाधीन दिनांक १६.१.२०१९ च्या प्रस्तावामधील दिनांक १०.३.१९९३ पूर्वीचे गट-क मधील ३ कर्मचारी व दिनांक ११.३.१९९३ ते दिनांक २७.३.२००० या

कालावधीत नियुक्त झालेल्या गट-क मधील ५१ कर्मचारी असे एकूण गट-क संवर्गातील ५४ दैनिक वेतनावरील कार्यरत कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

ब) औरंगाबाद महानगरपालिकेतील दिनांक १०.३.१९९३ पूर्वीचे गट-ड मधील १ कर्मचारी व दिनांक ११.३.१९९३ ते दिनांक २७.३.२००० या कालावधीत नियुक्त झालेल्या गट-ड मधील १३५ कर्मचारी असे एकूण गट-ड संवर्गातील १३६ दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांना महानगरपालिकेच्या सेवेत नियमित समावेशन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

क) उपरोक्त गट-क व गट-ड मधील कार्यरत दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांचे समावेशन करण्याकरिता औरंगाबाद महानगरपालिकेच्या संदर्भाधीन दिनांक १८.२.२०१९ च्या पत्रात नमूद केल्याप्रमाणे सोबतच्या **परिशिष्ट "अ"** मधील तपशिलानुसार, १५४ अस्थायी अधिसंख्य पदे निर्माण करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

ड) उपरोक्त नमूद दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांचे समावेशन तसेच अस्थायी अधिसंख्य पदांची निर्मिती खाली नमूद करण्यात आलेल्या अटी व शर्तींच्या अधिन राहून करण्यात येत आहे :-

***अटी व शर्ती :-***

१) औरंगाबाद महानगरपालिकेत सध्या कार्यरत असलेल्या दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त अन्य कोणाचीही नियुक्ती सदर अधिसंख्य पदांवर करता येणार नाही.

२) कोणत्याही कारणास्तव सदर अधिसंख्य पद रिक्त झाल्यास ते त्या दिनांकापासून आपोआप निरसित होईल.

३) दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांना नियमित करण्यासाठी निर्माण करण्यात आलेली अधिसंख्य पदे त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर आपोआप व्यपगत होत असल्याने, त्यांच्या वारसदारांना नियुक्ती देण्यासाठी कोणतेही अधिसंख्य पद निर्माण करण्यात येणार नाही अथवा व्यपगत झालेले पद पुर्नजिवीत करता येणार नाही.

४) सदरची मंजुरी देताना शासन निर्णय,नगर विकास विभाग, क्र.संकीर्ण १००५/वर्गीकरण/ प्र.क्र.३७९/०५/नवि-२४, दिनांक ४.५.२००६ मधील ३५% आस्थापना खर्चाची बाब "विशेष बाब" म्हणून शिथील करण्यात येत आहे.

५) यापुढे कोणत्याही परिस्थितीत दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्यात येणार नाही. याची जबाबदारी आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांची राहिल.

६) पुढील आर्थिक वर्षात महानगरपालिकेचा आस्थापना खर्च ३५% च्या मर्यादेत येण्याच्या अनुषंगाने आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात. त्याची जबाबदारी आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांची राहिल.

७) संबंधित दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांच्या समावेशनानंतर त्यांच्या वेतनाकरीता शासनाकडून कोणताही निधी महानगरपालिकेस मंजूर करण्यात येणार नाही.

८) समावेशन करण्यात आलेल्या सर्व दैनिक वेतनावरील नियमित सेवा सर्वप्रयोजनार्थ त्यांच्या समावेशनाच्या दिनांकापासून ग्राह्य धरण्यात यावी तसेच संबंधित दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांनी कोणत्याही न्यायालयात दावा दाखल केला असल्यास तो बिनशर्त मागे घेण्यात यावा. औरंगाबाद महानगरपालिकेने समावेशनाचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी उक्त दोन्ही बाबींसंदर्भात संबंधित कर्मचाऱ्यांकडून बंधपत्र घेण्यात यावे व खातरजमा करावी.

९) समावेशनाच्या दिनांकापासून संबंधित कर्मचाऱ्यांना सेवाजेष्ठता, निवृत्तीवेतन इत्यादि विषयक लाभ अनुज्ञेय राहतील.

१०) समावेशनामुळे त्यांना पूर्वीच्या सेवा कालावधीतील वेतन, भत्ते व अन्य अनुषंगिक वित्तीय लाभ यांची थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.

११) लाड-पागे समितीच्या शिफारशी, आवश्यकतेनुसार उपरोक्त अटींसह या अधिसंख्य पदावरील कर्मचाऱ्यांना लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००९२८१७४३३६३७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Vasant Patil

Digitally signed by Pradeep Vasant Patil
DN: CN = Pradeep Vasant Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2020.09.29 12:49:54 +05'30'

**( प्रदीप पाटील )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
२) मा.मंत्री, (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा. राज्यमंत्री, (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
४) प्रधान सचिव, नगर विकास (नवि २),मंत्रालय,मुंबई
५) प्रशासक तथा आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका,औरंगाबाद
६) निवडनस्ती (नवि-२४).

(शासन निर्णय क्र.औमपा-२०१९/प्र.क्र.३१/नवि-२४,दि. २८.९.२०२० चे **परिशिष्ट "अ"**)

औरंगाबाद महानगरपालिकेतील गट-क व गट-ड मधील कार्यरत दैनिक वेतनावरील कर्मचाऱ्यांच्या समावेशनसाठी निर्माण केलेल्या अस्थायी अधिसंख्य पदाचा तपशिल खालीलप्रमाणे :-

| **अ. क्र.** | **पदनाम** | **वेतनश्रेणी** | **निर्माण केलेल्या अधिसंख्य पदाची संख्या** |
|---|---|---|---|
| १. | मिश्रक | ५२००-२०२०० (ग्रेड पे २८००) | ०१ |
| २. | प्लॅन्ट ऑपरेटर | ५२००-२०२०० (ग्रेड पे २८००) | ०१ |
| ३. | कनिष्ठ लिपिक | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | १३ |
| ४. | क्युरेटर (कनिष्ठ लिपिक) | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०१ |
| ५. | डार्करुम सहाय्यक | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०१ |
| ६. | चित्रपट चालक | ५२००-२०२०० (ग्रेड पे १९००) | ०१ |
| ७. | नोंदणी लिपिक | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | १६ |
| ८. | प्रयोगशाळा सहाय्यक | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०२ |
| ९. | विद्युत लाईनमन | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०३ |
| १०. | सेवक/ सेविका | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ५१ |
| ११. | वॉचमन/ चौकीदार | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ३२ |
| १२. | वॉर्डबॉय | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०२ |
| १३. | मदतनीस | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०२ |
| १४. | मजूर | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | २६ |
| १५. | हमाल | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०१ |
| १६. | स्वीपर | ४४४०-७४४० (ग्रेड पे १३००) | ०१ |
| | | **एकूण** | **१५४** |

Pradeep Vasant Patil

Digitally signed by Pradeep Vasant Patil
DN: CN = Pradeep Vasant Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2020.09.29 12:50:17 +05'30'

**( प्रदीप पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**